**विभागातून निर्गमित होणारे सर्व शासन निर्णय / परिपत्रक दोन्ही सभागृहाचे विरोधी पक्षनेता, विधानसभा सदस्य व विधानपरिषद सदस्य यांना पृष्ठांकित करण्याबाबत व संकेतस्थळावर अपलोड करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**कार्यालयीन परिपत्रक, क्र. गृहआ-२०१७/प्र.क्र.२६४/आस्था-२**
दुसरा मजला, मंत्रालय, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०००३२.
दि. ११ जुलै, २०१७.

वाचा :- १) शासन परिपत्रक, सा.प्र.वि., क्र.संकीर्ण २०१२/प्र.क्र.३२/१८(र.व का.), दि.२८.०६.२०१२.
२) शासन परिपत्रक, सा.प्र.वि., क्र.विमंस-२०१३/प्र.क्र.६७/१८ (र.व का.), दि.२७.०७.२०१५.

## कार्यालयीन परिपत्रक

शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, दि.२८.०६.२०१२ अन्वये मंत्रालयीन प्रशासकीय विभागातून निर्गमित होणारे शासन निर्णय / परिपत्रक दोन्ही सभागृहाच्या विरोधी पक्षनेत्यांना पृष्ठांकित करण्याबाबत सूचना दिल्या आहेत. तसेच शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, दि.२७.०७.२०१५ अन्वये, विधानमंडळ / संसद संदस्यांना सन्मानाची व सौजन्याची वागणूक देणे, त्यांचेकडून आलेल्या पत्र / अर्ज / निवेदनांना पोच देणे / त्यावर सत्वर कार्यवाही करणे, शासकीय कार्यक्रमांना लोकप्रतिनिधींना आंमत्रित करणे, त्यांचे नाव निमंत्रण पत्रिकेवर छापणे इत्यादीबाबत मार्गदर्शक तत्वे विहित करण्यात आली आहेत. त्यामधील परिच्छेद ७ (i) नुसार मंत्रालयातील प्रत्येक प्रशासकीय विभागांनी निर्गमित केलेले शासन निर्णय / परिपत्रके यांच्या प्रती दोन्ही सभागृहांचे विरोधी पक्षनेता तसेच विधानसभा सदस्य व विधानपरिषद सदस्यांना पाठविणे आवश्यक आहे.

२. उपरोक्त अनुषंगाने, विभागातील सर्व कार्यासनांना सूचना देण्यात येत आहेत की, विभागातून निर्गमित होणारे सर्व महत्वाचे शासन निर्णय, परिपत्रक इत्यादी दोन्ही सभागृहाच्या विरोधी पक्षनेता, विधानसभा सदस्य व विधानपरिषद सदस्य यांना न चुकता पृष्ठांकित करण्यात यावेत. तसेच शासनच्या संकेतस्थळावर अपलोड करण्यात यावेत.

३. सदर कार्यालयीन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०१७०७१११६५९१५६०२९ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

V. M. Bhat

Digitally signed by V. M. Bhat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5f0272b97156a5d2812bad6725ca46fb2671d1da08208cfdd6677fac0afd6bf2, cn=V. M. Bhat
Date: 2017.07.11 16:55:55 +05'30'

**(व्यं.मा.भट)**
उप सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव,
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,मंत्रालय, मुंबई,
३. मा.सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव / स्वीय सहायक,
४. मा.विरोधी पक्षनेता, विधान सभा / विधान परिषद यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई,
५. मा.सर्व सन्माननीय विधानसभा/ विधानपरिषद सदस्य,
६. मा.मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक,मंत्रालय, मुंबई,
७. अपर मुख्य सचिव (गृह) यांचे स्वीय सहायक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
८. प्रधान सचिव (अपील व सुरक्षा) यांचे स्वीय सहायक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
९. प्रधान सचिव (परिवहन व बंदरे) यांचे स्वीय सहायक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०.प्रधान सचिव (राउशु) यांचे स्वीय सहायक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
११.प्रधान सचिव (विशेष) यांचे स्वीय सहायक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
१२.उप सचिव (कार्यासन १८), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३.गृह विभागातील सर्व सह सचिव/ उप सचिव /अवर सचिव / कक्ष अधिकारी
१४.गृह विभागातील सर्व कार्यासने,
१५. निवड नस्ती / आस्था-२, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,